**वडगाव-मावळ, जिल्हा पुणे येथील दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर वडगाव मावळ यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीडीओ ०३२२/प्र.क्र.४०/का.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. ०९ मार्च, २०२२.

वाचा:-

१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक:- पदनि २०१८/१०९९/प्र.क्र.१८६/का-११, दि.०५.०२.२०२१.
२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक:- पुरमा -०२२१/प्र.क्र.१४/कार्या-११, दि.२६.०३.२०२१.
३) शासन अधिसूचना विधि व न्याय विभाग क्रमांक:- पदनि २०१८/१०९९/प्र.क्र.१८६/का-११, दि.३१.०१.२०२२.
४) उच्च न्यायालय, मुंबई यांचे No:B(W)A-१२०७/२०११/५१६/६७९८, दि.२६.०२.२०२२.
५) जिल्हा न्यायालय,पुणे यांचे जा.क्र.वेतन/ १४६८/२०२२,दि.१७.०२.२०२२.
६) दिवाणी न्यायालय,वडगाव-मावळ यांचे जा.क्र.दि.न्या,२०/२०२२,दि.१६.०२.२०२२.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दिनांक ०५.०२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये पुणे जिल्हयातील वडगाव-मावळ येथे दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) हे न्यायालय स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दिनांक २६.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर न्यायालयाकरीता आवश्यक खर्चासाठी लागणा-या निधीबाबत मान्यता देण्यात आली आहे. अ.क्र.३ येथील नमूद दिनांक ३१.०१.२०२२ रोजीच्या अधिसूचनेन्वये दिनांक ०६ जानेवारी, २०२२ पासून दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) वडगाव-मावळ हे न्यायालय कार्यान्वित झाले आहे. संदर्भाधीन अ.क्र.४,५ व ६ रोजीच्या पत्रान्वये दिवाणी न्यायालय, वडगाव-मावळ यांनी केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) वडगाव-मावळ जिल्हा पुणे यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

दिवाणी न्यायालय (वरिष्ठ स्तर) वडगाव-मावळ, जि.पुणे यांचेसाठी दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) वडगाव मावळ,जि.पुणे यांना “कार्यालय प्रमुख” तसेच “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर न्यायालयातील सर्व प्रकारची देयके कोषागारात सादर करण्यासाठी त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८,दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग, १ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार तसेच महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम १५(३) व १५६ अन्वये दिलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०९१६०४२६८०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e3103 0c791f4b, pseudonym=A05C54A04D3293F61521D5E463E799884D63F286, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92 AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2022.03.09 16:05:19 +05'30'

**( हेमांगी शेटये )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) प्रबंधक (निरीक्षणे- १/२), उच्च न्यायालय, मुंबई.

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जि.पुणे.

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४) दिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) वडगाव-मावळ,जि.पुणे.

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

६) उप कोषागार अधिकारी,वडगाव-मावळ,जि.पुणे

७) कक्ष अधिकारी का.२३/२०,विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) कक्ष अधिकारी, कोषा (प्रशा-५) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती.